नागरी संरक्षण स्वयंसेवकांना सुधारित दराने कर्तव्यभत्ता व परेडभत्ता मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृहविभाग [ विशेष]

शासन निर्णय क्र. सीडीएम ३४९६/१४१८/४९/वि.शा.-८

मंत्रालय, मुंबई -३२, दिनांक: ३ मार्च १९९८.

वाचा :- १] शासन निर्णय गृहविभाग [ विशेष], क्र. सीडीएम ३४९२/१८९४/वि.शा.-८ दिनांक ७.४.९३

२] नागरी संरक्षण, संचालनालयाचे पत्र क्र. नासंस/कार्या-२/२८/स्वयंसेवक/९६, दिनांक ९.१२.९६.

**शासन निर्णय :-** नागरी संरक्षण दलातील स्वयंसेवकांना खालीलप्रमाणे सुधारित दराने कर्तव्यभत्ता / व प्रशिक्षण / परेडभत्ता देण्यास शासन मंजुरी देत आहे. मात्र ह्या सुधारित दरांना दि. ~~१ मार्च~~ १ एप्रिल १९९८ पासून लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| भत्त्याचा प्रकार. | प्रचलित दर | सुधारित दर |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| अ] कर्तव्य भत्ता | रु. २२/- प्रत्येकी प्रतिदिनी | रु. ३१/- प्रत्येकी प्रतिदिनी |
| ब] प्रशिक्षण/संचलन भत्ता | १ १/२ ते २ १/२ तासाच्या परेड/प्रशिक्षणासाठी रु. १०/- २ १/२ तासांपेक्षा जास्त कालावधीसाठी परेड/ प्रशिक्षणासाठी रु. २०/- | १ १/२ ते २ १/२ तासाच्या परेड/ प्रशिक्षणासाठी रु. १४/- २ १/२ तासांपेक्षा जास्त कालावधीसाठी परेड / प्रशिक्षणासाठी रु. २८/- |

२. यासाठी होणारा खर्च "२०७०-इतर प्रशासनिक सेवा [१०६] नागरी संरक्षण [तीन ] राज्य नागरी संरक्षण संघटना" या शीर्षाखाली टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. नागरी संरक्षण स्वयंसेवकांना देण्यात येणाऱ्या कर्तव्यभत्ता व प्रशिक्षण भत्ता यासाठी होणाऱ्या खर्चाच्या २५ टक्के खर्च केंद्र शासनाकडून भरपाई होण्यास पात्र आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडील वाट्याची रक्कम भरपाई करून घेण्याची कारवाई वेळोवेळी संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य यांनी करावी.

३. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर २६/९८/व्यय-८, दि. १३.१.९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

[ श्रीमती श. रा. भोजंकर ]
कार्यासन अधिकारी, गृहविभाग [ विशेष], महाराष्ट्र शासन.

महासंचालक, नागरी संरक्षण भारत सरकार, गृहमंत्रालय, नवी दिल्ली [पत्राने]
संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, [ले. व अ.]/[लेखा परीक्षा], महाराष्ट्र -१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, नाशिक, पुणे, रायगड.
वित्त विभाग /व्यय -८
गृहविभाग /बांयुडी -१.

---